प्रमाणें ॥ मुमुक्षेंशरणजावें ॥ ५ ॥ गुरुतोसकळांसिंब्राह्मण ॥ जन्हितो जालाक्रियाहिण ॥ तन्हितयासिंशरण ॥ अनन्यभावेंअसावें ॥ ६ ॥ अहोयाब्राह्मणाकारणें ॥ अवतारघेतलानारायणें ॥ विष्णुनेश्रीवत्समिरवणे ॥ तेथेंइतरतेकिती ॥ ७ ॥ ब्राह्मणवचनेंप्रमाण ॥ होतीशुद्राचेब्राह्मण ॥ धातुपाषाणिदेवपण ॥ ब्राह्मणाचेनिमंत्रें ॥ ८ ॥ मुंजिबंधनाविरहीत ॥ तोशूद्रचिनिभ्रांत ॥ द्विजन्माम्हणोनिसतत ॥ द्विजऐसेंनामत्याचें ॥ ९ ॥ ब्राह्मणेंपाविजेदेवाधिदेवा ॥ तन्हिकिमर्थसद्गुरुकरावा ॥ ऐसेंम्हणाल तन्हिनिजठेवा ॥ सद्गुरुवीणनाहीं ॥ १० ॥ स्वधर्मेकर्मीपूज्यब्राह्मण ॥ परिज्ञाननव्हेसद्गुरुविण ॥ ब्रह्मज्ञाननस्तांसिग ॥ जन्ममृत्युचुकेना ॥ ॥ ११ ॥ सद्गुरुविणज्ञानकांहीं ॥ सर्वथाहोणारनाहीं ॥ अज्ञानप्राणि प्रवाहीं ॥ वाहतचिगेले ॥ १२ ॥ ज्ञानविरहितजेंजेंकेलें ॥ तेंतेंजन्मासि मूळजालें ॥ म्हणोनिसद्गुरुचींपाउलें ॥ सद्दढधरावीं ॥ १३ ॥ जयास वाटेदेवव्हावा ॥ तेणेसत्संगधरावा ॥ सत्संगेविणदेवाधिदेवा ॥ पाविजेत नाहीं ॥ १४ ॥ नानासाधनेबापुडीं ॥ सद्गुरुवीणकरितीवेडीं ॥ गुरुकृपेविणकुडकुडीं ॥ व्यर्थचिहोती ॥ १५ ॥ कार्त्तिकस्नानेंमाघस्नानें ॥ व्रतेंउद्यापनेंदानें ॥ गोरांजनेंधूम्रपाने ॥ साधितीपंचाग्नि ॥ १६ ॥ हरिकथापुराणश्रवण ॥ आदरेंकरितीनिरूपण ॥ सर्वतीर्थेंपरमकठिण ॥ करितीप्राणी ॥ १७ ॥ झळझळितदेवतार्चनें ॥ स्नानसंध्यादर्भासनें ॥ टिळेमाळागोपिचंदने ॥ ठसेश्रीमुद्रांचीं ॥ १८ ॥ अर्घ्यपात्रेंसंपुष्टगोकर्णें ॥ मंत्रयंत्राचिंतांब्रपर्णें ॥ नानाप्रकारिउपकर्णें ॥ साहित्यशोभा ॥ १९ ॥ घंटाघणघणावाजती ॥ स्तोत्रेंस्तवनेंआणिस्तुती ॥ आसनेंमुद्राध्यानेंकरिती ॥ प्रदक्षणानमस्कार ॥ २० ॥ पंचायतनपूजाकेली ॥ मृत्तिकेचीं लिंगेंलाखोली ॥ बेलेंनारीकेळेंभरिलीं ॥ संपूर्णसांगपूजा ॥ २१ ॥ उपोषणेंनिष्ठानेम ॥ परमसायासिंकेलेंकर्म ॥ फळचिपावतीवर्म ॥ चुकले प्राणी ॥ २२ ॥ यज्ञादिककर्मेंकेलीं ॥ त्वदर्यीफळाशाकल्पिलीं ॥ आपुळे

इच्छेनेंघेतलीं ॥ सुतिजन्माची ॥ २३ ॥ करूनि नाना सायास ॥ केला चौदा विद्यांचा अभ्यास ॥ रिद्धिसिद्धि सावकाश ॥ बोळल्या जरी ॥ ॥ २४ ॥ तरि सद्‌गुरु कृपेविरहित ॥ सर्वथा नघडे स्वहित ॥ यमपुरीचा अनर्थ ॥ चुकेना येणें ॥ २५ ॥ जंवनाहि ज्ञानप्राप्ती ॥ तंव चुकेना यातायाती ॥ गुरुकृपेविण अधोगती ॥ गर्भवास चुकेना ॥ २६ ॥ ध्यानधारणा मुद्रा आसन ॥ भक्तिभाव आणि भजन ॥ सकळ फोल ब्रह्मज्ञान ॥ जंव तें प्राप्त नाहीं ॥ २७ ॥ सद्‌गुरुकृपा न जोडे ॥ आणि भलतिकडे वावडे ॥ जैसे आंधळे चाचरुनि पडे ॥ गारि आणि गडदरा ॥ २८ ॥ जैसें नेत्रीं घालितां अंजन ॥ पडे दृष्टीस निधान ॥ तैसें सद्‌गुरुवचनें ज्ञान ॥ प्रकाश होये ॥ २९ ॥ सद्‌गुरुविण जन्म निर्फळ ॥ सद्‌गुरुविण दुःख सकळ ॥ सद्‌गुरुविण तळमळ ॥ जाणार नाहीं ॥ ॥ ३० ॥ सद्‌गुरुचेनि अभयकरें ॥ प्रगट होइजे ईश्वरें ॥ जन्मदुःखें अपारें ॥ नासोनिजाती ॥ ३१ ॥ मागांजाले थोर थोर ॥ संत महंत मुनेश्वर ॥ तयासही ज्ञानविचार ॥ सद्‌गुरुचेनीं ॥ ३२ ॥ श्रीरामकृष्णादिकरूनी ॥ अति तत्पर गुरुभजनी ॥ सिद्धसाधु आणि सज्जनीं ॥ गुरुदास्य केलें ॥ ३३ ॥ सकळ सृष्टिचे चाळक ॥ हरिहर ब्रह्मादिक ॥ तेहि सद्‌गुरुपदीं रंक ॥ महत्वा चढती ॥ ३४ ॥ असो जयास मोक्ष व्हावा ॥ तेणें सद्‌गुरु करावा ॥ सद्‌गुरुविणें मोक्ष पावावा ॥ हें कल्पांतिं नघडे ॥ ३५ ॥ आतां सद्‌गुरु ते कैसे ॥ नव्हेत इतरां गुरु ऐसे ॥ जयाचे कृपेनें प्रकाशे ॥ शुद्धज्ञान ॥ ३६ ॥ त्या सद्‌गुरुचि वोळखण ॥ पुढिले समासीं निरूपण ॥ बोलिलें असे श्रवण ॥ अनुक्रमें करावें ॥ ३७ ॥ इति श्री दासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचमदशके गुरुनिश्चय निरूपणं नाम समास प्रथमः ॥ १ ॥

॥ समाप्त ॥

---



# काकडआरती.

नारायण, नारायण, नारायण, नारायण ॥
बेळगायितु, बेळगायितु, बेळगायितु, बेळगायितु ॥

एलु नारायणा एलु लक्ष्मीरमणा एलु श्रीगिरिवास श्रीव्यंकटेशा ॥ पल्ल ॥
कासिद हालगलु कावडियल्लि तुंबि लेसागि हालुमसरु बेण्णियु कडेदू ।
शेषशयननमेले समुद्रमथनव माडि देश केंपायितु एलु हरिये ॥ १ ॥
अरलु मल्लिगिजाजि परिमळद पुष्पवनु सुररु तंदिट्टारे सुजनर एल्ला ।
अरविंदलोचना श्रीगोपाळकृष्णा एळय्या एलु निनगेष्टु निद्रा ॥ २ ॥
दासरेल्लारु बंदु धूळिदर्शनगोंडु लेसागि ताळदंडिगे पिडिदु ।
आदिकेशव नम्म विष्णुनामस्मरणि उदयदल्लेहु पाडुतिर्प हरिये ॥ ३ ॥

( २ )

शरणु सिद्धिविनायका शरणु विद्याप्रदायका ।
शरणु पार्वतितनयमूरुति शरणु मूषकवाहना ॥ पल्ल ॥
निटिलनेत्रने वरदपुत्रने नागभूषणप्रियने ।
कटिकटांगदकोमलांगने कनककुंडलधारिणे ॥ १ ॥
बट्ट मुत्तिन पदकधारिणे बाहुहस्तचतुष्टने ।
इट्टतोळिदहेमकंकणपाशांकुशधारिणे ॥ २ ॥
कुक्षिमहालंबोदरने इक्षुचापव गेलिदने ।
पक्षिवाहननादपुरंदरविट्ठलनु निजदासनु ॥ ३ ॥
नारायण, नारायण, नारायण, नारायण ॥

(३)

उठोनियां प्रातःकाळीं वेगें जाऊं राउळासी ।
जळतिल पातकाच्या राशी काकडआरती देखिल्या ॥ १ ॥
उठा उठा हो साधुजन साधा आपुलालें हित ।
गेला गेला नरदेह मग कैंचा भगवंत ॥ २ ॥
उठोनियां पहांटे विठोबा पाहूंबा नीट ।
चरण तयाचे अमोलिक अवलोकूं दृष्टीं या ॥ ३ ॥
जागे करा रुक्मिणिवरा देव निजले निजमंदिरा ।
वेगीं निंबलोण करा दृष्ट होईल तयासी ॥ ४ ॥
ढोल दमामे गर्जती पुढें वाजंत्री वाजती ।
काकडआरती होती पांडुरंगरायाची ॥ ५ ॥
सिंहशंखनादभेरी गजर होतो महाद्वारीं ।
केशवराज विटेवरी नामा चरणीं वंदितो ॥ ६ ॥

(४)

गुरु हा संतकुळींचा राजा । गुरु हा प्राणविसावा माझा ।
गुरुविण देव नाहीं दुजा । पाहतां त्रैलोकीं ॥ १ ॥
गुरु हा सुखाचा सागर । गुरु हा प्रेमाचा आगर ।
गुरु हा धैर्याचा डोंगर । कदाकाळीं डळमळेना ॥ २ ॥
गुरु हा सत्यालागीं साह्य । गुरु हा साधकांसी माय ।
गुरु हा कामधेनु गाय । भक्तावरीं दुभतसे ॥ ३ ॥
गुरु हा भक्तीचें मंडण । गुरु हा काळासी दंडण ।
गुरु हा करितसे खंडण । नानापरी पापाचें ॥ ४ ॥
गुरु हा वैराग्याचें मूळ । गुरु हा परब्रह्म केवळ ।
गुरु हा दाखवी तात्काळ । गांठी लिंगदेहाचें ॥ ५ ॥
गुरु हा घाली ज्ञानांजन । गुरु हा दाखवी निजधन ।
गुरु हा सौभाग्य देऊन । स्वात्मबोध नांदवी ॥ ६ ॥

कायाकाशी गुरु उपदेशी । तारक मंत्र दिला आम्हांसी ।
बाप विठ्ठल रखुमायेसी । विठ्ठल विनवी गुरुचरणीं ॥ ७ ॥

( ५ )

फळलें भाग्य माझें । धन्य झालें संसारीं ।
सद्गुरु भेटले हो । त्यांनीं धरियेलें करीं ।
पश्चिमें चालवीलें । आत्मा तेथें निर्धारी ।
त्रिकूटावरी नांदे । देखियेली पंढरी ॥ १ ॥
तें सुख काय सांगू । वाचें बोलतां नये ।
आरतीचेनि योगें । गेलें मीपण माझें ॥ धृ० ॥
राउळामाजी जातां । राहे देह–अवस्था ।
मन हें उन्मन झालें । नसे बद्धतेची वार्ता ।
हेतु हा मावळला । शब्दा आली निःशब्दता ।
तटस्थ होउनि ठेलें । निजरूप पाहतां ॥ २ ॥
त्रिगुण गुण बाई । पुर्ण उजळल्या वाती ।
नवलाव अविनाश । न जाये स्वयंज्योती ।
लावितां लक्ष तेथें । हालूं विसरलीं पातीं ।
नातुडे मन माझें । न कळे दिवसरात्री ॥ ३ ॥
आरती विठ्ठलाची । पुर्ण उजळली अंतरीं ।
प्रकाश थोर झाला । सांठवेना अंबरीं ।
रविशशि मावळले । तया तेजा मझारीं ।
वाजतीं दिव्यवाद्यें । अनुहत गजरीं ॥ ४ ॥
आनंदसागरांत । प्रेमें बुडी दिधली ।
लाधलें सौख्य मोठें । नये बोलतां बोली ।
सद्गुरुचेनि संगें । ऐसी आरती केली ।
निवृत्ति आनंदांत । तेथें वृत्ति निमाली ॥ ५ ॥
विठ्ठल, विठ्ठल, विठ्ठल, पुंडलीक वरदा हरि विठ्ठल !

——•○:○:○•——

आम्यें सद्गुरू आले घरा । परमानंद भरला सारा । भक्ति करूं आनंदें ॥ ध्रु० ॥
संतसज्जनाचा मेळा । भावें वंदु वेळोवेळा । काळ भीती नाहीं ते ॥ १ ॥
काळ पळुनि गेला दुरी । सद्गुरुपा जाहले वरी । जिकडे तिकडे आनंद ॥ २ ॥
दुर्लभ नरदेह प्राप्ति । सद्गुरूकृपेनें फिटली भ्रांति । जन्ममरण चुकलेरे ॥ ३ ॥
पंचप्राण काकडारती । सद्गुरु चरणीं धरुनि प्रीति । मनोभावे ओवाळुं ॥ ४ ॥
ऐसा आनंद सोहळा । वस्तुदर्शन वेळोवेळा । नारायणा देई रे ॥ ५ ॥

# सकाळचें भजन.

गणाधीश जो ईश सर्वां गुणाचा ।
मुळारंभ आरंभ तो निर्गुणाचा ।
नमो शारदा मूळ चत्वारि वाचा ।
गमो पंथ आनंत या राघवाचा ॥ १ ॥
नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं व्यासं ततो जयमुदीरयेत् ॥ २ ॥
श्रूयता देवदेवेश नारायण जगत्पते ।
त्वदीयनामध्यानेन कथयिष्ये शुभाः कथाः ॥ ३ ॥
ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं
द्वंद्वातीतं गगन सदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम्
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ ४ ॥

( २ )

सद्गुरुनाथ माझे आई । मला ठाव द्यावा पायीं ॥ ( २ वेळ )
मला ठाव द्यावा पायीं । मला ठाव द्यावा पायीं ॥ ( २ वेळ )
सद्गुरुनाथ माझे आई । मला ठाव द्यावा पायीं ॥ ( २ वेळ )

( ३ )

पहिलें पाहतां श्रीमुख । तहान हरपली भूक ॥ १ ॥
पहा पहा डोळे भरी । मूर्ति सांवळी गोजिरी ॥ २ ॥
रवि शशि ज्याच्या कळा । तो हा मदनाचा पुतळा ॥ ३ ॥
तुका म्हणे वर्णूं काय । घेतो आलया बालय ॥ ४ ॥

( ४ )

वामसव्य दोहींकडे । दिसे देवाचें रूपडें ॥ १ ॥
खालीं पाहे अथवा वरी । जिकडे पहावें तिकडे हरी ॥ २ ॥
डोळे झांकूनियां पाहे । पुढें गोपाळ उभा आहे ॥ ३ ॥
अणुरेणु चक्रपाणी । खूण झाली दासी जनी ॥ ४ ॥

( ५ )

हडबडलें पातक । रामनाम घेतां एक ॥ १ ॥
नाम घेतां तत्क्षणीं । चित्रें ठेविली लेखणीं ॥ २ ॥
घेउनि पुजेचा संभार । ब्रह्मा येतसे सामोर ॥ ३ ॥
नामा ह्मणे हें जरी लटकें । तरी छेदावें मस्तक ॥ ४ ॥

( ६ )

तिळाएवढें बांधुनि घर । आंत राहे विश्वंभर ॥ १ ॥
तिळाइतुकें बिंदुलें । तेणें त्रिभुवन कोंदाटलें ॥ २ ॥
हरिहराच्या मुर्ती । बिंदुल्यांत येती जाती ॥ ३ ॥
तुका ह्मणे हें बिंदुलें । तेणें त्रिभुवन कोंदाटलें ॥ ४ ॥

( ७ )

आनंदू रे आजि आनंदू रे । सबाह्य अभ्यंतरीं अवघा परमानंदू रे॥१॥
एक दोन तीन चार पांच सहा। इतकें विचारूनि मग परमानंदीं रहा ॥२॥
सातवा राम आठवा वेळोवेळां । बापरखुमादेविवरु विठ्ठल जवळा ॥३॥

( ८ )

कृपाळू सज्जन तुम्हीं संतजन। एवढें कृपादान द्यावें मज ॥ १ ॥
आठवण तुम्हीं द्यावी पांडुरंगा। देवा माझी सांगा काकुलती ॥ २ ॥
अन्यायी अपराधी पतित आगळा। परि पायांवेगळा नका ठेवूं ॥ ३ ॥
तुका म्हणे तुम्हीं निरविल्यावरी। मग मज हरी उपेक्षीना ॥ ४ ॥

# दुपारचें भजन.

धन्यहो प्रदक्षिणा सद्गुरुरायाची।
धन्य धन्य हो प्रदक्षिणा श्रीगुरुरायाची।
झाली त्वरा सुरवरां विमान उतरायाची ॥ धृ० ॥
पदोपदीं घडल्या अपार पुण्याच्या राशी।
सकळही तीर्थें घडलीं आह्मां आदिकरूनि काशी ॥ १ ॥
कोटि ब्रह्महत्या हरती करितां दंडवत।
लोटांगण घालितां मोक्ष लोळे पायांत ॥ २ ॥
मृदंग टाळ घोळ भक्त भावार्थें गाती।
नामसंकीर्तनीं नित्यानंदें नाचती ॥ ३ ॥
गुरुभजनाचा महिमा न कळे निगमां आगमांसी।
अनुभव जे जाणती ते गुरुपदिंचे अभिलाषी ॥ ४ ॥
प्रदक्षिणा करूनी देह भावें वाहिला।
श्रीरंगात्मजा विठ्ठल पुढें उभा राहिला ॥ ५ ॥

( २ )

लक्ष्य लक्षुनि पाहे निजवस्तु। परात्पर चिन्मय ब्रह्मरूप तेज प्रत्यक्ष आहे ॥ गुरुपद वंदुनि आधिं पाहि तूं। हृदयावरिं शोधुनि मनातें धूर्त करी बोधुनी ॥ कामक्रोध मदमत्सर अंगीं। दंभाहंकार

जिरवुनी द्वैत–कल्पना–मार त्यागुनि ॥ एकाग्रें मन स्वस्थ करोनी । बैस पद्मासनी मुद्रा लाव आत्मभाषणीं ॥ दृष्टीं आंत दृष्टि सुरंग । करूनियां समदृष्टि मग ॥ नाना तऱ्हेचे रंग सुरंग । रक्तश्वेतपीत आहे पुढें नीलवर्ण तेज जाणावें ॥ १ ॥ नीलवर्णे तें बिंबाकाशीं । चैतन्याची मुस त्यामध्यें वस्तु जडली असें ॥ त्रिकुट भेदुनि उलट जातां । मी मार्गानें धसे रूप अरूप होऊनी प्रवेश ॥ उन्मन होउनियां ब्रह्मरंध्रीं । समाधि लावुनि बसे तेंथें काळ कदा ना धसे ॥ सिद्ध पुरुष तो योग साधुनी । तापा स्तवितो करून हरण ॥ आपुला आपण राहे निमग्न । त्यालाचि प्राप्ति होय चराचर अवघेंची ब्रह्म आहे ॥ २ ॥ सदगुरुकृपा जखमाचि वारी । ज्याला घाव लागेल तोचि घायाळगती घुंमतो ॥ बीजमंत्र हा जप गायत्री । अष्टौप्रहर योजितो साधन घडि पळ घडि साधितो ॥ अहंभावें मीपण तन धन । गुरूचरणीं अर्पितो तो हा मूळ पित्या इच्छितो ॥ अखंड तन्मय त्यांत लुब्धुनी । निजवस्तु लक्षितो लोचनीं ॥ निरापेक्ष तो निर्मळ प्राणी । जगांत वेडा राहे अंतरी ज्ञानबोधरस पिये ॥ ३ ॥ सदगुरुकृपा उत्तम ज्यासी । सहज हातासी आली त्याला निजवस्तु लाधली ॥ पाहातां पाहातां आत्मज्योत ही । वैराग्यें पाजळली चिन्मय वस्तु झळमळली ॥ शाहालिरंग संतप्रमाण । धन्य गुरुमाउली आनंदें हरिवर कृपा केली ॥ कवनकटाक्षें करि सिद्धांत । गणपति भीमसेन गातो सभेंत ॥ गुरुपुत्र तो ज्ञानवंत । ऐकुनि तल्लिन होये लुंगरा व्यर्थ चावटी वाहे ॥ ४ ॥

( ३ )

काय सांगू या समर्थांची थोरी । भजकासी आपणाऐसा करी ॥ धृ० ॥
सदगुरुराजा तन्मय छत्रपति । मज करुनी सेवे अधिपती ।
सोऽहं शद्ब सनद देउनि हातीं । शिरीं हात ठेविला मुद्रांकित ॥ १ ॥

अहंकाराचे दुर्ग आवरीले । तयावरी मजला पाठवीलें ।
पूर्वद्वारें त्रिकुट देखीयेलें । रजोदृष्टी ब्रह्मयासी जिंकीयेलें ॥ २ ॥
तेथुनि ऊर्ध्वपंथें पश्चिममार्ग पाहे । सत्वगुणीं श्रीहाटीं विष्णु आहे ।
तया वळंघोनी वरुता जाय । तमो गोल्हाटीं रुद्र दिसताहे ॥ ३ ॥
ज्ञानशस्त्र घेऊनियां हातीं । केली तमो-अज्ञानाची शांती ।
पुण्यगिरी तेथुनि देखे पुढतीं । शुद्ध अधिष्ठानीं विश्वमूर्ती ॥ ४ ॥
उभा राहोनि तया गिरीवरी । देखे भ्रमरगुंफा गडद ओवरी ।
औटपीठावरुती शोभे बरी । परमानंद आहे तया घरीं ॥ ५ ॥
बोधबळिया प्रवेशलों तेथ । अहंकार झाला वाताहत ।
विजयदुंदुभि वाजति अनुहत । ब्रह्मदृष्टींत पावलों निजविश्रांत ॥ ६ ॥
भक्तिनिशाण चढवीलें वरी । जें कां ब्रह्म भासत चराचरीं ।
रामनामें गर्जती जयजयकारीं । दासपण न उरे तेथें उरी ॥ ७ ॥

( ४ )

सखया रामा विश्रांति तुझे नामीं । ह्मणउनि मजला ने त्वरें निजसुख-धामीं ॥ धृ० ॥ अवचट सुकृतें नरदेहा झाली भेटी । पशु–सुत–जाया–धन–धामीं प्रीती मोठी । माझीं माझीं ह्मणुनि म्यां धरिलीं पोटीं । यांच्या संगें भोगिल्या दुःख कोटी ॥ १ ॥ सोडुनि स्वहिता धांवलों दिशा दाही । शववत झालों मागुता कौतुक पाही । परि खळजन हे निंदिती कवडी तें ही । परि ही आशा पापिणी लाजत नाहीं ॥ २ ॥ जंववरि दृढता तंववरी या तनुची प्रीती । जर्जर झालीया अवघेचि निंदक होती । याचीं दुःखें तुजला मी सांगू किती । म्हणउनि येतो श्रीधर काकुलती ॥ ३ ॥

( ५ )

काय सांगू मी या संतांचे उपकार । मज निरंतर जागविती ॥ १ ॥
सहज बोलणें हित उपदेश । करुनि सायास शिकवीती ॥ २ ॥

काय द्यावें त्यासी व्हावें उतराई। ठेवितां हा पायीं जीव थोडा ॥३॥
तुका म्हणे वत्स धेनुवेच्या चित्तीं। तैसें मज येथें सांभाळीती ॥ ४ ॥

(६)

झाली संध्या संदेह माझा गेला। आत्माराम हृदयीं सहजीं आला ॥धृ०॥
गुरुकृपा निर्मळ भागीरथी। शांति क्षमा यमुना सरस्वती। अशीं पदें एकत्र जेथें होतीं। स्वानुभव ज्ञान हें मुक्तस्थिती ॥ १ ॥ सद्बुद्धीचें घालोनि दर्भासन। क्षमा दया श्रीगुरु पद्मासन। शम दम अंगीं विभूतिलेपन। वाचे उच्चारी केशवनारायण ॥ २ ॥ बोधपुत्र निर्माण झाला जेव्हां। ममता म्हातारी मरोनि गेली तेव्हां। भक्ति बहीण आली असे गांवा। आतां संध्या करूं मी कैशी केव्हां ॥ ३ ॥ सहज कर्में झाली ब्रह्मार्पण। ऐसें ऐकोनी निवती साधुजन। जन नोहे अवघाचि जनार्दन। एका जनार्दनीं लाधली निजखूण ॥ ४ ॥

(७)

निरंजनी वनीं देखिली मी गाय। तीन तिचे पाय चार मुख ॥ १ ॥
सहस्त्र तीचे नयन नव तीचे कान। सत्रावीचें स्थान एक शिंग ॥ २ ॥
ऐशी कामधेनू व्यासानें पाळिली। शुकानें वळिली जनकाघरीं ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसे भाग्य नरा भेटे। अभाग्य करंटे वाया गेले ॥ ४ ॥

(८)

देह तो पंढरी प्रेम पुंडलीक। स्वभाव सन्मुख चंद्रभागा ॥ १ ॥
विवेकाची वीट आत्मा पंढरीराव। जेथें तेथें देव ठसावला ॥२॥ क्षमा दया दोन्ही रुक्मिणी ते राई। दोहींकडे वाही उभी असे ॥ ३ ॥
बुद्धि व वैराग्य गरुड हनुमंत। कर जोडोनि तेथें पुढें उभा ॥ ४ ॥
तुका म्हणे आम्हीं देखिली पंढरी। चुकविली फेरी चौऱ्याशींची ॥ ५ ॥



# रात्रीचें भजन

**गुरुवारः**—जय जय गुरुमहाराज गुरू ( ४ वेळ ) जयगुरु जयगुरू जयगुरु जयगुरू ( २ वेळ ) जयजय गुरुमहाराज गुरू । जयजय परब्रह्म सद्गुरू ॥ ( १ वेळ )

**शुक्रवारः**—पावना रामा पतीतपावना रामा ( खालील स्वरांत २ वेळ ) पावना रामा ( इतकेंच उंच स्वरावरून चालू स्वरांत आल्यावर पूर्ववत खालील स्वरांत ) पावना रामा पतीतपावना रामा ( २ वेळ ) हरि नारायण गुरुनारायण । घडि घडि जिव्हे करि पारायण । तव दासोऽहं नारायण । हरि नारायण गुरु नारायण ॥ लक्ष्मी श्रीरंगधर सीतारघुवीर राधेगोविंदा । हरि हरि राधे गोविंदा । रखुमाई पांडुरंगा ( ३ वेळ )

**शनिवारः**—मारुती सखया बलभीमा, भजना लागो दे प्रेमा ( २ वेळ ) भजना लागो दे प्रेमा, भजना लागो दे प्रेमा ॥ ( २ वेळ ) मारुती सखया बलभीमा, भजना लागो दे प्रेमा ( २ वेळ )

**रविवारः**—सांब सदाशिव सांब सदाशिव सांब सदाशिव सांब हरा हरा ( सावकाश )

**सोमवारः**—सांब सदाशिव सांब सदाशिव सांब सदाशिव सांबा ( जलद २ वेळ ) सांब सदाशिव साऽब ( उंच स्वरांत १ वेळ ) सांब सदाशिव सांब सदाशिव सांब सदाशिव सांबा ( पूर्ववत् २ वेळ )

**मंगळवारः**—रविवारप्रमाणेंच.

**बुधवारः**—हरि हरि विठ्ठल रखुमाई विठोबा ( खालील स्वरांत ३ वेळ ) हरि हरि विठ्ठल रखुमाई विठोबा ( उंच स्वरांत ३ वेळ ) हरि हरि विठ्ठल रखुमाई विठोबा ( चालू स्वरांत ३ वेळ )

# बारा अभंग.

जन्माचें तें मूळ पाहीलें शोधून । दुःखासी कारण जन्म घ्यावा ॥ १॥
पापपुण्य करुनी जन्मा येतो प्राणी । नरदेहा येऊनि हानि केली ॥ २ ॥
रजतमसत्त्व आहे ज्याचे अंगीं । याच गुणें जगीं वायां गेला ॥ ३ ॥
तम म्हणजे काय नरकाचि केवळ । रज तो सबळ मायाजाळ ॥ ४ ॥
तुका ह्मणे येथें सत्त्वाचें सामर्थ्य । करावा परमार्थ अहर्निशीं ॥ ५ ॥

( २ )

अहर्निशीं सदा परमार्थ करावा । पाय न ठेवावा आडमार्गीं ॥ १ ॥
आडमार्गीं कोणी जन जे जातील । त्यांतुनी काढील तोचि ज्ञानी ॥ २ ॥
तोचि ज्ञानी खरा तारी दुजीयांसी । वेळोवेळां त्यांसी शरण जावें ॥३॥
आपण तरेल नव्हे तें नवल । कुळें उद्धरील सर्वांचीं तो ॥ ४ ॥
शरण गेलियानें काय होतें फळ । तुका ह्मणे कुळ उद्धरीलें ॥ ५ ॥

( ३ )

उद्धरीलें कुळ आपण तरला । तोचि एक झाला त्रैलोक्यांत ॥ १ ॥
त्रैलोक्यांत झालें द्वैताचि निमालें । ऐसें साधियलें साधन बरवें ॥ २ ॥
बरवें साधन सुख शांती मना । क्रोध नाहीं जाणा तिळभरी ॥ ३ ॥
तिळभरी नाहीं चित्तासी तो मळ । तुका ह्मणे जळ गंगेचें तें ॥ ४ ॥

( ४ )

जैसी गंगा वाहे तैसें त्याचें मन । भगवंत जाण त्याचेजवळी ॥ १ ॥
त्याचेजवळी देव भक्तिभावें उभा । स्वानंदाचा गाभा तया दिसे ॥ २ ॥
तया दिसे रूप अंगुष्ठ प्रमाण । अनुभवी खूण जाणती हे ॥ ३ ॥
जाणती हे खूण स्वात्मानुभवी । तुका ह्मणे पदवी ज्याची त्याला ॥ ४ ॥

( ५ )

ज्याची त्याला पदवी इतरा न साजे । संताला उमजे आत्मसुख ॥ १ ॥
आत्मसुख घ्यारे उघडा ज्ञानदृष्टी । यावीण चावटी करूं नका ॥ २ ॥

करूं नका कांहीं संतसंग धरा । पूर्वीचा जो दोरा उगवला ॥ ३ ॥
उगवेल प्रारब्ध संतसंगें करूनी । प्रत्यक्ष पुराणीं वर्णियेलें ॥ ४ ॥
वर्णियेल्या एका गुणनामघोषें । जातील रे दोष तुका ह्मणे ॥ ५ ॥

( ६ )

दोष रे जातील अनंत जन्मींचे । पाय त्या देवाचे न सोडावे ॥ १ ॥
न सोडावे पाय निश्चय तो करा । आळवा शार्ङ्गधरा भावबळें ॥ २ ॥
धरुनि केशव आणा भावबळें । पापियां न कळे कांहीं केल्या ॥ ३ ॥
न कळे तो देव संतसंगावांचुनि । वासना जाळोनि शुद्ध करा ॥ ४ ॥
शुद्ध करा मन देहातीत व्हावें । वस्तुसी ओळखावें तुका ह्मणे ॥ ५ ॥

( ७ )

ओळखा रे वस्तु सांडा रे कल्पना । नका आडराना जाऊं ह्मणीं ॥ १ ॥
ह्मणीं जाल कोठें बुडवाल हीत । विचारी मनांत आपुलिया ॥ २ ॥
आपुलिया जीवें शिवासि पहावें । आत्मसुख घ्यावें वेळोवेळां ॥ ३ ॥
घ्यावें आत्मसुख स्वरूपीं मिळावें । भूतीं लीन व्हावें तुका ह्मणे ॥ ४ ॥

( ८ )

भूतीं लीन व्हावें सांगावें नलगेचि । आतां अहंकाराची शांती करा ॥ १ ॥
शांती करा तुह्मी ममता नसावी । अंतरी वसावी भूतदया ॥ २ ॥
भूतदया ठेवा मग काय उणें । प्रथम साधन हेंचि असे ॥ ३ ॥
असो हें साधन ज्यांचे चित्तीं वसे । मायाजाळ नासे तुका ह्मणे ॥ ४ ॥

( ९ )

मायाजाळ नासे या नामें करूनि । प्रीति चक्रपाणीं असो द्यावी ॥ १ ॥
असो द्यावी प्रीति साधूंचे पायांसी । कदा कीर्तनासी सोडूं नये ॥ २ ॥
सोडूं नये पुराणश्रवण कीर्तन । मनन निजध्यास साक्षात्कार ॥ ३ ॥
साक्षात्कार झालिया सहज समाधि । तुका म्हणे उपाधि गेली त्याची ॥४॥

( १० )

गेली त्याची जाणा ब्रह्म तोचि झाला । अंतरीं निवाला पूर्णपणें ॥ १ ॥
पूर्णपणें धाला राहतो कैशा रीती । त्याची आतां स्थिती सांगतो मी ॥२॥

सांगतो मी तुम्हां ऐका मनोगत । राहतो मूर्खवत जगामाजी ॥ ३ ॥
जगात पिशाच अंतरीं शहाणा । सदा ब्रह्मीं जाणा निमग्न तो ॥ ४ ॥
निमग्न तो सदा जैसा मकरंद । अंतर्बाह्य भेद वेगळाले ॥ ५ ॥
वेगळाले भेद किती त्या असती । ह्रद्गत त्याची गती न कळे कवणा ॥६॥
न कळे कवणाला त्याचें हेंचि वर्म । योगी जाणे वर्म खूण त्याची ॥७॥
खूण त्याची जाणे जे तैसे असती । तुका म्हणे भ्रांती दुजियाला ॥ ८ ॥

( ११ )

दुजियाला भ्रांती भाविकांला शांती । साधूंची ती वृत्ति लीन झाली ॥१॥
लीन झाली वृत्ति ब्रह्मातें मिळाले । जळांत आटलें लवण जैसें ॥ २ ॥
लवण जैसें पुन्हां जळाचे बाहेरी । येत नाहीं खरें त्यांतुनीया ॥ ३ ॥
त्यासारिखे तुम्हीं जाणा साधुवृत्ति । पुन्हां न मिळती मायाजाळ ॥४॥
मायाजाळ त्यांना पुन्हां रे बाधेना । सत्य सत्य जाणा तुका म्हणे ॥५॥

( १२ )

स्वर्गलोकींहूनि आले हे अभंग । धाडियेले सांग तुम्हांलागीं ॥ १ ॥
नित्यनेमें यांसी पठतां प्रतापें । जळतिल पापें जन्मांतरिंचीं ॥ २ ॥
तया मागेंपुढें रक्षी नारायण । मांडिल्या निर्वाण उडी घाली ॥ ३ ॥
बुद्धीचा पालट नासेल कुमती । होईल सद्भक्ती येणें पंथें ॥ ४ ॥
सद्भक्ति झालिया सहज साक्षात्कार । होईल उद्धार पूर्वजाचा ॥ ५ ॥
साधतील येणें इहपरलोक । सत्य सत्य भाक माझी तुम्हां ॥ ६ ॥
परोपकारासाठीं सांगितलें देवा । प्रासादिक मेवा ग्रहण करा ॥ ७ ॥
येणें भवव्यथा जाईल तुमची । सख्या विठ्ठलाची आण मज ॥ ८ ॥
टाळ आणि कंथा धाडिली निशाणी । घ्यारे ओळखोनी सज्जन हो ॥९॥
माझें दंडवत तुम्हां सर्व लोकां । देहासहित तुका वैकुंठासी ॥ १० ॥

( १३ )

सत्य सत्य जाणा त्रिवाचा नेम हा । अनुभव पहा पदोपदीं ॥ १ ॥
पदोपदीं पहा श्रीमुख चांगले । प्रत्यक्ष पाऊलें विठोबाचीं ॥ २ ॥
विठोबाचे भेटी हरेल बा चिंता । तुम्हालागीं आतां सांगितलें ॥ ३ ॥

सांगितलें खरे विश्वाचिया हिता । अभंग वाचिती जे का नर ॥ ४ ॥
ते नर पठणीं जीवन्मुक्त झाले । पुन्हां नाहीं आले संसारासी ॥ ५ ॥
संसार उडाला संदेह फिटला । पूर्ण तोचि झाला तुका म्हणे ॥ ६ ॥

( १४ )

चार कोटि एक लक्षाचा शेवट । चौतिस सहस्र स्पष्ट सांगितले ॥१॥
सांगितले हे तुका कथोनियां गेला । बारा अभंगांला सोडूं नका ॥ २ ॥
सोडूं नका तुम्हां सांगितलें वर्म । भवपाशीं कर्मे चुकतील ॥ ३ ॥
चुकती यातायाती विठोबाची आण । करा हे पठण जीवेंभावें ॥ ४ ॥
जीवें भावें करितां होईल दर्शन । प्रत्यक्ष सगुण तुका म्हणे ॥ ५ ॥

( १५ )

वेदाचे अभंग केले श्रुतिपर । द्वादश सहस्र संहितेचे ॥ १ ॥
निघंट निरुक्त आणि ब्रह्मसूत्र । अवतार सहस्र उपग्रंथ ॥ २ ॥
अभंग हे कोटि भक्तिपर झालें । ज्ञान पर केले तितुकेंची ॥ ३ ॥
पंचाहत्तर लक्षीं वैराग्य वर्णिलें । नाम तें गाईलें तितुकेंची ॥ ४ ॥
साठ लक्ष केला बोध या जगासी । वर्णिलें रूपासि तितुकेंची ॥ ५ ॥
तीस लक्ष केली देवासि करुणा । कर्मकांड जाणा एक लक्ष ॥ ६ ॥
द्वादशसहस्र स्वात्मानुभवीं । एवं जाणा सर्व संख्या ऐशी ॥ ७ ॥
ऐसे हे अभंग झालेसे भूतळीं । पांच अंतराळीं पत्रिकेची ॥ ८ ॥
चौतिस सहस्र लक्ष एक कोटि पांच। सांगोनिया साच गेला तुका ॥९॥

( १६ )

सगुण हें ब्रह्म विठ्ठलचि बोले । ऐक पां वहिलें तुकारामा ॥ १ ॥
तुकारामा तुवां केले जे अभंग । करिती जे कां जगीं नित्य पाठ ॥ २ ॥
जगीं पाठ करितां आवडी सद्भावें । विपत्ति न होय त्या प्राण्यासीं ॥३॥
प्राण्याचें कल्याण होईल बा पाहे । भावें वाचितां हे नित्यनेमें ॥ ४ ॥
नेमें संकष्टासी करी अकरा पाठ । विघ्न त्याचें स्पष्ट दूर होय ॥ ५ ॥
दूर होय विघ्न विठ्ठल म्हणे तुकया । शेवटीं निज ठाया नेईन मी ॥६॥

( १७ )

गुरुचरणीं ठेविलि भाव । आपेंआप भेटे देव ॥ १ ॥ म्हणुनि गुरुसी भजावें । रूप ध्यानासी आणावें ॥ २ ॥ देव गुरुपाशीं आहे । वारंवार सांगूं काये ॥ ३ ॥ तुका म्हणे गुरुभजनीं । देव भेटे जनीं वनीं ॥ ४ ॥

( १८ )

जयजय गुरुमहाराज गुरु ( ५ वेळ ) जयजय परब्रह्म सद्गुरू ( १ वेळ )
जयगुरु जयगुरु जयगुरु जयगुरु ॥ जयगुरु जयगुरु जयगुरु जयगुरु ॥

( १९ )

सब संतनकी जय ! बालगोपालकी जय ! तुकाराममहाराजकी जय ! ज्ञानोबामहाराजकी जय ! रुक्मांगदमहाराजकी जय ! कृष्णद्वैपायन महाराजकी जय ! रामदासमहाराजकी जय ! रघुनाथप्रियमहाराजकी जय ! गुरुलिंगजंगम महाराजकी जय ! श्रीभाऊसाहेब महाराजकी जय ! श्रीगुरुदेव दत्त दत्त दत्त ! ! !

( २० )

रामाश्रम सद्गुरुराज । गुरुलिंगजंगम महाराज ॥ ( २ वेळ )
गुरुलिंगजंगम महाराज । गुरुलिंगजंगम महाराज ॥ ( २ वेळ )
रामाश्रम सद्गुरुराज । गुरुलिंगजंगममहाराज ॥ ( २ वेळ )
हिंचगिरीवासी सद्गुरुराज । उमदी भाऊसाहेबमहाराज ॥ ( २ वेळ )
उमदी भाऊसाहेबमहाराज । उमदी भाऊसाहेब महाराज ॥ ( २ वेळ )
हिंचगिरीवासी सद्गुरुराज । उमदी भाऊसाहेब महाराज ॥ ( २ वेळ )

( २१ )

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळां । माझिया सकळां हरिच्या दासा ॥ १ ॥
कल्पनेची बाधा न हो कोणेकाळीं । ही संतमंडळी सुखी असो ॥ २ ॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा । माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥ ३ ॥
शरीर प्राणांसी करीन कुरवंडी । क्षण एक न सोडी संग त्याचा ॥ ४ ॥
नामा ह्मणे तया असोंवे कल्याण । ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ५ ॥
विठ्ठल रखुमाई विठोबा रखुमाई । विठ्ठल विठ्ठल विठ्ठल ! ! !

( २२ )

मी तंव अन्यायी अपराधी । कर्महिन मतिमंदबुद्धी ॥ १ ॥ तुज म्यां आठविलें नाहीं कधीं । वाचे कृपानिधि मायबापा ॥ २ ॥ नाहीं ऐकिलें गाइलें गीत । धरिली लाज सांडिलें हित ॥ ३ ॥ नावडे पुराण बैसले संत । केली बहुत परनिंदा ॥ ४ ॥ केला नाहीं करविला नाहीं परोपकार । नाहीं दया आली पीडितां पर ॥५॥ करूं नये तो केला व्यापार । उतरी भार तुका ह्मणे ॥ ६ ॥ ज्ञानोबा तुकाराम ज्ञानबा तुकाराम तुकाराम तुकाराम तुकाराम ! ! !

( २३ )

अहो बोलिले लेंकरूं । वेडें वांकुडें उत्तरूं ॥ १ ॥ क्षमा करा अपराध । महाराज तुह्मी सिद्ध ॥ धृ० ॥ अहो नाहीं विचारिला । अधिकार म्या आपुला ॥ २ ॥ तुका ह्मणे ज्ञानेश्वरा । राखा पायांपें किंकरा ॥ ३॥

( २४ )

पाहे प्रसादाची वाट । द्यावें धुवोनियां ताट ॥ १ ॥ शेष घेउनि जाईन । तुमचें झालिया भोजन ॥ २ ॥ अहो झालों एकसवा । तुह्मां आड न ये देवा ॥ ३ ॥ तुका ह्मणे चित्त । करूनि राहिलों निवांत॥४॥

---

## विडा.

विडा घ्याहो नारायणा । कृष्णा जगज्जीवना । विनविते रखुमाई । दासी होईन मी कान्हा ॥ धृ० ॥ शांति हे नागवेली । पानें घेऊनियां करीं । मीपण जाळुनीयां । चुना लावियेला वरी ॥ १ ॥ वासना फोडुनीयां । चूर्ण केली सुपारी । भावार्थ कापुरानें घोळियेली निर्धारीं॥२॥ विवेक हा कातरंग । रंगीं रंगला सुरंग । वैराग्य जायफळ । मिळविलें सकळ ॥ ३ ॥ दया हे जायपत्री । क्षमा लवंगा आणिल्या । सुबुद्धि वेलदोडे । शिवरामीं अर्पियेले ॥ ४ ॥

( २ )

विडा घई नरहरी राया । धरूनि मानवाची काया । यति वेष घेऊनीयां । वससी दीनासी ताराया ॥धृ०॥ ज्ञान हें पूगी फळ । भक्ति नागवल्ली दळ । वैराग्य पूर्ण विमळ । लवंगा सत्क्रिया सकळ ॥ १ ॥ प्रेमरंगी जैसा कात । वेला अष्ट भावसहित । जायफळ क्रोधरहित । पत्री सर्व भूत राहित ॥ २ ॥ खोबरें हेंचि क्षमा । काढुनी द्वैताच्या बदामा । मनोजाचा वर्ख हेमा । कापूर हा शांति नामा ॥ ३ ॥ कस्तूरी निरहंकार । कोठें न मिळती हे उपचार । भीमपुत्र यास्तव फार । सत्वर देई वारंवार ॥ ४ ॥

( ३ )

माडो परमेश्वरगुरुध्याना । बिडदिरुवदु भजना । नोडो नी निन्नोळू निजखूना । पूर्णैक्यद ज्ञाना ॥१॥ अपरूपद नरतनुविदु नोडो । शडगरदा पाडो । अपहास्यव माडदे नी कूडो । घनचिन्मय गूडो ॥२॥ अग्नीचक्रद बळियल्लि । एरडु कमलदल्लि । प्राज्ञा झगिझगि सुव बेळकल्लि । तिळि निन्नोळगिल्लि ॥ ३ ॥ मेलिन स्थानद सहस्रारा । गुरुतत्त्वदपूरा । पेळारोलुवल्लद सुखसारा । शंकर पदविवरा ॥ भीमा ॥ ४ ॥

हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥ गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥ नलगे मुक्ति धन संपदा । संत संग देई सदा ॥ ३ ॥ तुका म्हणे गर्भवासीं । सुखें घालावें आम्हांसी ॥ ४ ॥

## ॥ आरत्या ॥

मंगळ जय जय तुंग उमदीश राया, श्रृंगार दीन्दली म्यर वंवगे ॥धृ०॥ असुरनाशगे कुशल प्रकाशगे, यशुवर्ळाय बाळाय ज्योतिगे ॥ मं० ॥ प्रमथाधीशगे पार्वतीप्रियगे, कार्माय तातगे मुप्पुरगे ॥ मं० ॥ कप्पु कळीगारगे वप्पुत्रिशुलगे, सच्चिदानंद शीवगे इवगे ॥ मं० ॥ इंचगिरी वासगे पंचप्रमेशगे, कंचीकरियालगे नीलगे ॥ मं० ॥ गुडधीश गुरवीगे पडवीया पालगे, शडगरधीशगे शंकरगे ॥ मं० ॥

—※—

ज्योतिबेळगुतादे झगाझग ज्योतिबेळगुतादे, ज्योतिबेळगुतदे ज्योतिबेळगुतदे ॥ ध्रु० ॥ अस्तमगिरिचन्नमस्तकदोलु चलव, वस्तु काणिसुतदे ॥ १ ॥ मानसतुदियेले ध्यानके न्यलकदे, ताने होळियुतदे ॥२॥ कंगळ मध्यदि तुंग गुड्डद योगी, लिंग होळियुतदे ॥३॥

———*———

आरती उमदीशा, तूंचि स्वयंप्रकाशा। व्यापुनि जगदीशा, पुरवी भक्त मनाशा ॥ ध्रु० ॥ स्मरतां तव नाम, नामीं जडलें प्रेम। प्रगटला आत्माराम, नामीं रंगलें मन ॥ १ ॥ असंख्य तव भक्तां, सतस्वीची अनंता। तूं तंव निजरूपा, दाविसी समर्था ॥ २ ॥ देवाधिनिजदेव प्रगटची स्वभाव। घेतां तव भाव, ऐसा सद्गुरुदेव ॥ ३ ॥

—❀—

जय जया दासबोधा ग्रंथराजा प्रसिद्धा। आरति ओंवाळीन विमळ ज्ञान बाळबोधा ॥ धृ० ॥ वेदांत संमतीचा काव्यसिंधु भरला। श्रुति शास्त्रग्रंथगीता साक्ष संगम केला। महानुभाव संतजनीं अनुभव चाखीला। अज्ञान जडजीवा मार्ग सुगम जाला ॥ १ ॥ नवविधा भक्तिपंथें रामरूप अनुभवी। चातुर्यनिधी मोठा मायाचक्र उगवी। हरिहरहृदयींचें गुह्य प्रगट दावी। बद्धाचि सिद्ध झाले असंख्यात मानवी ॥२॥ वीसही दशकींचा अनुभव जो पाहे। नित्यनेम विवरितां स्वयें ब्रह्मचि होये। अपार पुण्य गांठीं तरि श्रवण लाहे। कल्याण लेखकाचे भावगर्भ हृदयीं ॥ ३ ॥

———

सुख सहिता दुःख रहिता निर्मळ एकांता। कलिमलदहना गहना स्वामी समर्था। न कळे ब्रह्मादीकां अंत अनंता। तो तूं आम्हा सुलभ जय कृपावंता ॥१॥ जयदेव जयदेव जय करुणाकरा। आरती ओंवाळूं सद्गुरु माहेरा ॥ धृ ॥ मायेविण माहेर विश्रांती ठाव। शद्बीं अर्थलाभ बोलणें वाव। सद्गुरु प्रसादें सुलभ उपाव। रामीरामदासा फळला सद्भाव ॥२॥

———

त्रिगुणात्मक त्रैमूर्ति दत्त हा जाणा। त्रिगुणी अवतार त्रैलोक्यराणा। नेति नेति शब्द न ये अनुमाना। सुरवरमुनिजनयोगिसमाधि न ये ध्याना ॥१॥ जयदेव जयदेव जय श्रीगुरुदत्ता। आरति ओंवाळितां हरसी भवचिंता ॥ धृ० ॥ सबाह्य अभ्यंतरीं तूं एक दत्त। अभाग्यासी कैंची कळेल ही मात। पराहि परतली तेथें कैंचा हा हेत। जन्ममरणाचाही पुरलासे अंत ॥ २ ॥ दत्त येऊनीया उभा ठाकला। भावें साष्टांगेंसीं प्रणिपात केला। प्रसन्न होऊनि आशीर्वाद दिधला। जन्ममरणाचा फेरा चुकविला ॥ ३ ॥ दत्त दत्त ऐसें लागलें ध्यान। हरपलें मन झालें उन्मन। मी तूं पणाची झाली बोळवण। एका जनार्दनीं श्रीदत्त ध्यान ॥ ४ ॥

---

धन्य धन्य गुरूराव। माझे देहीं दाविला देव ॥ध्रु॥ देहाचें देऊळ केलें। आत्मलिंग आंत स्थापिलें ॥१॥ त्रिगुणाच्या वळिल्या वाती। निर्गुणाच्या लाविल्या ज्योती ॥२ ॥ पंचप्राण पंचारती। मुक्ताबाई ओंवाळिती ॥३॥

---

जयजया काडसिद्धा आरति माडुवे सिद्धा ॥ पल्ल ॥ मुत्तिन आरतिगे बंगारद बत्ति। दीविगि चंद्रदीप्ति बेळगुवे पूर्णभक्ति ॥१॥ आरति माडुत प्रेमदिंद हाडुत। स्वामि ना निन्न दूता करुणा माडो कृपावंता॥२॥आरतिगे मेच्चितानु वरव कूडलि बंदा। कृपादृष्टिगळिंदा तुळजाग सदानंदा ॥ ३ ॥

पंचप्राणवेंबु आरति माडीरी। पंचतत्त्ववेंबु बत्ति हच्चीरी। चंचल वृत्तियंब घृतवन्हाकीरी। पंचकर्मेंद्रियगळ दहन माडीरी ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय परमहंसा, गुरु परमहंसा। दय माडि दय्यानि यनगे सर्वेशा। जयदेव जयदेव ॥ ध्रु० ॥ आदर परसि आरु चक्रा मीरिसिदि। वेदके निलुकद निजगुणरत्ना तोरिसिदि ॥ आदिनाथनल्लि लक्ष्य विडि- सिदि। नादद मूल ॐ कारदोळु बेरिसिदि ॥ २ ॥ तंदे त्रिमल्ल नि स ुरुनाथा। कंदगे ज्ञानद वस्तु कोट्टंथा दाता ॥ संदेह बिडिसि यनगे माडिदि प्रख्याता। छंददि भजिसुवे ना निनगे अवधूता ॥ ३ ॥

आरती ज्ञानराजा। महाकैवल्यतेजा। सेविती साधुसंत। मनु वेधला माझा ॥ ध्रु० ॥ लोपलें ज्ञान जगीं। हित नेणती कोणी।

अवतार पाडुरंग । नाम ठेविलें ज्ञानी ॥ १ ॥ कनकाचें ताट करीं । उभ्या गोपिका नारी । नारद तुंबर हो । सामगायन करी ॥ २ ॥ प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें । रामा जनार्दनीं । पायीं टकचि ठेलें ॥३॥



मंगलं महालिंग उमदीशा । मुनिजन पोषा । भ्रमर कुंतळि कांत सर्वेशा । हिंचगिरिवासा ॥ ध्रु० ॥ पृथ्विमेलिन प्रेमभक्तरनु । परिपालिसुव, नित्यनित्यदि सत्य शंकरने । चित्तशुद्धि माडु यन्न, कर्तु निन्नय करुणविट्टु । मृत्युविन बाधेयनु बिडिसुव, सत्यसद्गुरु काडसिद्धा ॥१॥ धरणि पालिप दुरित संहरने । त्रिपुरांतकने, चरण सेवक भजक रक्षकने । मायाधि नीने, परम पावन पंचपाशकने । मरेय होक्कर बिरदु कायुव, अरवु कोट्टु मरवु अळियुव, शरण जनर स्मरणि तारक, सुंदरात्मक सगुण निधिये ॥ २ ॥ अष्टदिक्पालकर ओडेयने । सृष्टिकर्त्ता, श्रेष्ठ सद्गुरुलिंगजंगमने । निष्ठेयिंदलि नंबिदवर कष्टकडिदु कडेय हायिसुव । वृष्टि अमृत सुरिदु जगदि जयजय पडेदंथ सद्गुरु ॥३॥

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा । वामांगीं रखुमाई दिसे दिव्य शोभा । पुंडलिकाचे भेटी परब्रह्म आलें गा । चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥१॥ जय देव जय देव जय पांडुरंगा । रखुमाईवल्लभा राईच्या वल्लभा पावें जिवलगा ॥ध्रु०॥ तुळशीमाळा गळां कर ठेउनि कटीं । कांसे पीतांबर कस्तुरि ललाटीं । देव सुरवर नित्य येती भेटी । गरुड हनूमंत पुढें उभे राहती॥२॥ धन्य वेणूनाद अनुक्षेत्रपाळा । सुवर्णाचीं कमळें वनमाळा गळां । राई रखुमाबाई राणीया सकळां । ओंवाळीती राजा विठोबा सांवळा ॥ ३ ॥ ओंवाळूं आरत्या कुर्वंड्या येती । चंद्रभागेमाजीं सोडुनियां देती । दिंड्या पताका वैष्णव नाचती । पंढरीचा महिमा वर्णावा किती ॥४॥ आषाढी कार्तिकी भक्तजन येती । चंद्रभागेमाजीं स्नानें जे करिती । दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ति । केशवासी नामदेव भावें ओंवाळिती ॥ ५ ॥

( प्रार्थना )

घालीन लोटांगण वंदिन चरण । डोळयांनीं पाहीन रूप तुझें ।
प्रेमें आलिंगीन आनंदें पूजीन । भावें ओंवाळीन ह्मणे नामा ॥ १ ॥

## शेजारत्या.

आतां स्वामी सुखें निद्रा करा अवधूता । नरसिंहसरस्वति अवधूता । चिन्मयसुखधामीं जाउनि पहुडा एकांता ॥ धृ० ॥ वैराग्याचा कुंचा घेउनि चौक झाडिला । तयावरी सप्रेमाचा शिडकावा केला ॥ १ ॥ पायघड्या घातल्या सुंदर नवविधा भक्ती । ज्ञानाच्या समया उजळुनि लाविल्या ज्योति ॥ २ ॥ भावार्थाचा मंचक हृदयाकाशीं टांगिला । मनाचीं सुमनें जोडुनि केलें शेजेला ॥ ३ ॥ द्वैताचें कपाट लावुनि एकत्र केलें । दुर्बुद्धीच्या गांठी सोडुनि पडदे सोडिले ॥ ४ ॥ आशातृष्णा कल्पनाचा सांडुनि गलबला । क्षमा दया शांती दासी उभ्या सेवेला ॥ ५ ॥ अलक्ष्य उन्मनि घेउनि नाजुक दुशेला । निरंजनीं सद्गुरु माझा निजीं निजेला ॥ ६ ॥

( २ )

हरि चला मंदिरा ऐसें म्हणती राधिका ॥ ऐसें म्हणती गोपिका ॥ भावें ओंवाळिती, यादव कुळटिळका ॥ १ ॥ आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा ॥ देव दयाळा पुरले मनोरथ, जातों आपुलिया स्थळा ॥ धृ० ॥ तुम्हासी जागविलें, आम्हीं आपुलिया चाडा ॥ शुभाशुभ कर्में दोष हरावया पीडा ॥ २ ॥ एकीकडे राई, एकीकडे रखुमाई ॥ भावें ओंवाळितां, हरी झाला दो ठायीं ॥ ३ ॥ अष्टाधिक सोळा सहस्त्र ज्याला सुंदरा ॥ ज्या ज्यांनीं प्रार्थिला, गेला तयांचिया घरा ॥ ४ ॥ एका जनार्दनीं हरि तूं लाघवी होसी ॥ इतुक्याही भोगुनी, ब्रह्मचारी म्हणविसी ॥ ५ ॥

## धांवा. ( एकादशीस म्हणणेचा. )

कृष्णा धांवबा, लवकरीं, संकट पडलें भारी । हरि तूं आमुचा, कैवारी, आलें विघ्न निवारी ॥ ध्रु० ॥ पांडव असतां, वनवासी, कळलें कौरवांसी । त्यांनीं पाठविले, ते ऋषी, सत्व हरायासी ॥ १ ॥ रात्र झालीऽसे, दोनप्रहर, आले ऋषीश्वर । भोजन मागती, सत्वर, करूं कैसा विचार ॥२॥ साठी सहस्त्र, खंड्या अन्न, दुर्वासा भोजन । सत्व जातील, घेऊन, अंतर पडतां जाण ॥ ३ ॥ आजि निष्ठुर कां, झालासी, कोठें गुतलासी । माझी होईल बा, गत कैशी, अनाथ मी परदेशी ॥ ४ ॥ कंठ शोषला, अनंता प्राण जाईल आतां । पदर पसरितें, तुज आतां, पाव रुक्मिणीकांता ॥ ५ ॥ आतां न लावी, उशीर, धर्म चिंतातूर । अनर्थ करील, तो फार, एवढा करीं उपकार ॥ ६ ॥ ऐकुनि बाहिणीची, करुणा, आला यादवराणा । द्रौपदि लोळतसे, हरिचरणां, उद्धवचिद्धन जाणा ॥ ७ ॥

## एकादशी.

तत्व कळतां मग जाणीव- भाव नाहीं । स्वानंदतृप्ति सकळांसहि मुक्ति पाही । राहोऽथवा तनु पडो समता जयाला । अद्वैत-बोध-पद निश्चय पूर्ण झाला ॥ १ ॥ स्वप्नेंद्रजालवत मायिक सर्व आहे । यालागिं निश्चय मनीं भय कोण वाहे । स्वप्रत्ययें विविध भावअभाव गेला । अद्वैतबोधपद० ॥ २ ॥ ज्ञानानळें विविध संचित दग्ध झालें । वंध्याविलासवत तें क्रियमाण झालें । प्रारब्ध शेष उरलें जन निश्चयाला । अद्वैत बोध पद० ॥ ३ ॥ कोणी उदास वनवासिच खेळ खेळे । कोणीहि कर्मरत आश्रमधर्म केले । स्वच्छंदता रमत एक विकल्प गेला । अद्वैतबोधपद० ॥ ४ ॥ रक्षू गजा मदगजारुढ राजभद्री । भिक्षू आकिंचन उदासिन हो दरिद्री । संकल्पशून्य मन आम्हीं भाव ठेला । अद्वैतबोधपद० ॥ ५ ॥ जीवेश्वरा आणि

जगाप्रति एक काळें । निर्धारिलें घटमठीं नभ जेंवि खेळे । वेदांत-संत-निज संमत याच बोला । अद्वैतबोधपद० ॥ ६ ॥ सिंधूहि सिंधूस भास्कर जो तयातें । त्याहूनि चोज उपमा न दिसे तयातें । वर्णिल कोण गुणवर्जित निर्गुणाला । अद्वैतबोधपद० ॥ ७ ॥ हा चिद्विलास मुनिमानस-हंस जाणा । विश्वीं वसे परि निरंकुश- गम्य जाणा ॥ रंगोनि भास्कर निजानुभवीं बुडाला । अद्वैतबोधपद० ॥ ८ ॥

---

## करुणाअष्टकें.

### गुरुवार.

ज्या संगतीनेंच विराग झाला । मनोदरींचा जडभास गेला । साक्षात्परात्मा मज भेटवीला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ १ ॥ सद्योगपंथें घरिं आणियेलें । अंगेंच मातें परब्रह्म केलें । प्रचंड तो बोधरवी उदेला । विसरूं० ॥ २ ॥ चराचरीं व्यापकता जयाची । अखंड भेटी मजला तयाची । परंपदीं संगम पूर्ण झाला । विसरूं० ॥ ३ ॥ जो सर्वदा गुप्त जनांत वागे । प्रपन्न भक्तां निजबोध सांगे । सद्भक्ति-भावाकरितां भुकेला । विसरूं० ॥ ४ ॥ अनंत माझे अपराध कोटी । नाणी मनीं घालुनि सर्व पोटीं । प्रबोधितां तो श्रम फार झाला । विसरूं० ॥५॥ कांहीं मला सेवन ही न झालें । तथापि तेणें मज उद्धरीलें । आतां तरी अर्पिन प्राण त्याला । विसरूं० ॥ ६ ॥ माझा अहंभाव असे शरीरीं । तथापि तो सद्गुरु अंगिकारी । नाहीं मनीं अल्प विकार झाला । विसरूं० ॥ ७ ॥ आतां कसा हा उपकार फेडूं । हा देह ओंवाळुनि दूर सोडूं । म्यां एकभावें प्रणिपात केला । विसरूं० ॥ ८ ॥ जया वानितां वानितां वेदवाणी । ह्मणे नेति नेति तिला जे दुरूनी । नव्हे अंत ना पार ज्याच्या रुपाला । विसरूं० ॥ ९ ॥ जो साधुच्या अंकित जीव झाला । त्याचा असे भार निरंजनाला । नारायणाचा श्रम दूर केला । विसरूं० ॥ १० ॥

### शुक्रवार.

तुझियां वियोगें जीवत्व आलें। शरीरयोगें बहु दुःख झालें। अज्ञान दारिद्य माझें सरेना। तुजवीण रामा मज कंठवेना॥ १॥ परस्त्री जिणें दीन फेडूं किती रे। उदास माझ्या मनिं वाटतें रे। लल्लाटरेखा तरि पालटेना। तुज० ॥ २॥ जडली उपाधी अभिमान साधी। विवेक नाहीं बहुसाल बाधी। तुझिया वियोगें पळही गमेना। तुज०॥ ३॥ विश्रांति नाहीं अभिमान देहीं। कुळाभिमानें पडलों प्रवाहीं। स्वहीत होतां मजला दिसेना। तुज०॥ ४॥ संसारसंगें बहु पीडलों रे। कारुण्यसिंधू मज सोडवी रे। कृपाकटाक्षें सांभाळि दीना। तुज०॥ ५॥ विषयीं जनानें मज लाजवीलें। प्रपंचसंगें आयुष्य गेलें। समयीं बहु क्रोध शांती भरेना। तुज०॥६॥ सुदृढ झाली देहबुद्धी पाहीं। वैराग्य कांहीं हें नांव नाहीं। अपूर्ण कामीं मन हें विटेना। तुज०॥ ७॥ निरूपणीं हे सद्बुद्धी होती। स्थलत्याग होतां सर्वेचि जाती। काय करूं रे क्रिया घडेना। तुज०॥ ८॥ जय जय दयाळा त्रैलोक्यपाळा। भवसिंधुहारी मज तारि हेळा। स्वामी वियोगें पळही गमेना। तुज०॥ ९॥ आह्मां अनाथां तूं एक दाता। संसारचिंता चुकवी समर्था। दासा मनीं आठव वीसरेना। तुजवीण रामा मज कंठवेना॥१०॥ जयजय रघुवीर समर्थ॥

### शनिवार.

उदासीन हा काळ जातो गमेना। सदा सर्वदा थोर चिंता शमेना। उठे मानसीं सर्व सोडून जावें। रघूनायका काय कैसें करावें॥ १॥ मना बोलतां बोलतां वीट वाटे। नसे अंतरीं सूख कोठें न कंठे। घडीनें घडी चित्त किती धरावें। रघू०॥ २॥ बहू पाहतां अंतरीं कोंड होतो। शरीरास तो हेत सोडोनि जातो। उपाधीस देखोनि वाटे सरावें। रघूनायका०॥ ३॥ अवस्था मनीं होय नाना परीची। किती काय सांगू गती अंतरींची। विवेकेंचि या मानसा आवरावें। रघूनायका०॥४॥ ह्मणे दास उदास झालों दयाळा। जनीं व्यर्थ संसार हा वायचाळा। तुझा मी तुला पूसतों प्रीय भावें। रघूनायका०॥ ५॥

( २ )

तुझा भाट मी वर्णितों रामराया । सदा सर्वदा गाय ब्रीदें सवाया । महाराज दे अंगिचें वस्त्र आतां । बहू जीर्ण झाली देहबुद्धि कंथा ॥ १ ॥ रामदूत, वायु-सूत, भीमगर्भ जुत्पती । जो नरांत, वानरांत, भक्तिप्रेमावित्पती । दासदक्ष स्वामिपक्ष नीजकाजसारथी । वीर जोर शीरजोर धक्क धिंग मारुती ॥ २ ॥

## रविवार.

असंख्यात ते भक्त होऊन गेले । तिहीं साधनांचे बहू कष्ट केले । नव्हे कार्यकर्ता भुमीभार झालों । तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों ॥१॥ बहू दास ते तापसी तीर्थवासी । गिरीकंदरीं भेटि नाहीं जनांसी । स्थिती ऐकतां थोर विस्मीत झालों । तुझा दास० ॥ २ ॥ सदा प्रेमळासी तया भेटलासी । तुझ्या दर्शनें स्पर्शनें पुण्यराशी । अहंता मदें शद्बज्ञानें बुडालों । तुझा दास० ॥ ३ ॥ तुझ्या प्रीतिचे दास निर्माण झाले । असंख्यात ते कीर्ति बोलोनि गेले । बहू धारणा थोर चकीत झालों । तुझा दास० ॥ ४ ॥ बहूसाळ देवालयें हाटकाचीं । रसाळा कळा लाघवें नाटकांचीं । पुजा देखतां जाड जीवीं गळालों । तुझा दास० ॥ ५ ॥ कितीकें देह त्यागिले तूजलागीं । पुढें जाहले संपतीचे विभागी । देह-दुःख होतांचि वेगें पळालों । तुझा दास० ॥ ६ ॥ किती योगमूर्ती किती पुण्यमूर्ती । किती धर्मसंस्थापना अन्नशांती । पस्तावलों कावलों तप्त झालों । तुझा दास० ॥ ७ ॥ सदा सर्वदा राम सांडूनि कामीं । समर्था तुझे दास आह्मीं निकामी । बहु स्वार्थबुद्धी नुरे कष्टवीलों । तुझा दास० ॥ ८ ॥ जयजय रघुवीर समर्थ ॥

## सोमवार.

उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी । अती आदरें सर्व सेवा करावी । सदा प्रीति लागो तुझे गूण गातां । रघूनायका मागणें हेंचि आतां ॥ १॥ तुझें रूपडें लोचनीं म्यां पहावें । तुझे गूण गातां मनासी रहावें । उठो

आवडी भक्तिपंथींचि जातां । रघू० ॥ २ ॥ मनीं वासना भक्ति तूझी करावी । कृपाळूपणें राघवें पूरवावी । वसावें मदीयांतरीं नाम घेतां रघू० ॥ ३ ॥ सदासर्वदा योग तूझा घडावा । तुझें कारणीं देह माझा पडावा । नुपेक्षीं मज गुणवंता अनंता । रघू० ॥ ४ ॥ नको द्रव्य दारा नको येर झारा । नको मानसीं ज्ञानगर्वें फुगारा । सगूणीं मज लावीं रे भक्तिपंथा । रघूनायका० ॥ ५ ॥ भवें तापलों प्रीति छाया करावी । कृपासागरें सर्व चिंता हरावी । मला संकटीं सोडवावें समर्था रघूनायका० ॥ ६ ॥ मनीं कामना कल्पना ते नसावी । कुबुद्धी कु वासना नीरसावी । नको संशयो तोडि संसारवेथा । रघूनायका० ॥ ७ समर्थापुढें काय मागों कळेना । दुराशा मनीं बैसली हे ढळेना । पु संशयो नीरसी सर्व चिंता । रघूनायका ० ॥ ८ ॥ ब्रीदाकारणें दीं हातीं धरावें । म्हणे दास भक्तासि रे उद्धारावें । सूटे ब्रीद आम्हां सोडूनि जातां । रघुनायका मागणें हेंचि आतां ॥ ९ ॥ जयजय रघुवी समर्थ ॥

## मंगळवार.

समाधान साधूजनांचेनि योगें । परि मागुतें दुःख होतें वियोगें घडीनें घडी शीण अत्यंत वाटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १ घरें सुंदरें सौख्य नानापरींचें । परी कोण जाणेल तें अंतरींचें । मन आठवितांचि तो कंठ दाटे । उदा० ॥ २ ॥ बळें लावितां चित्त को जडेना । समाधान तें कांहीं केल्या पडेना । नये धीर डोळां सदा नी लोटे । उदा० ॥ ३ ॥ अवस्था मनीं लागली काय सांगों । गुण गुंतला हेत कोणासि मागों । बहूसाल भेटावया प्राण फूटे । उदा० ॥४ कृपाळूपणें भेट रे रामराया । वियोगें तुझ्या सर्व व्याकुळ काया जनांमाजि लौकीक हाही न सूटे । उदा० ॥ ५ ॥ अहा रे विधी त असें काय केलें । पराधीनता पाप माझें उदेलें । बहूतांमधें तूकतां तू तूटे । उदा० ॥ ६ ॥ समर्था मनीं सांडि माझी नसावी । सदा सर्व भक्तचिंता असावी । घडेना तुझा योग हा प्राप्त कोठें । उदा० ॥ ७

अखंडीत हे सांग सेवा घडावी । न होतां तुझी भेटिकाया पडावी
दिसंदीस आयुष्य हें व्यर्थ लोटे । उदा० ॥ ८ ॥ भजों काय सर्वोपरि
हीन देवा । करूं काय रे सर्व माझाचि ठेवा । ह्मणों काय मी कर्म रेख
न लोटे । उदा० ॥ ९ ॥ ह्मणें दास मी वाट पाहें दयाळा । रघूनायक
भक्तपाळा भुपाळा । पहावें तुला हें जिवीं आर्त मोठें । उदा० ॥ १० ।

## बुधवार.

युक्ति नाहीं बुद्धि नाहीं विद्या नाहीं विवंचितां । नेणता भक्त मं
तूझा बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥ मन हें आवरेना कीं वासना वाव
सदा । कल्पना धांवते सैरा बुद्धि० ॥ २ ॥ अन्न नाहीं वस्त्र नाहं
सौख्य नाहीं जनांमध्यें । आश्रयो पाहतां नाहीं बुद्धि० ॥ ३ ।
बोलतां चालतां येना कार्यभाग कळेचिना । बहूत पीडलों लोकं
बुद्धि० ॥ ४ ॥ तुझा मी टोणपा झालों कष्टलों बहुतां परी । सौख्य तं
पाहतां नाहीं बुद्धि० ॥ ५ ॥ नेटकें लिहितां येना वाचितां चुकतों सदा
अर्थ तो सांगतां येना बुद्धि० ॥ ६ ॥ प्रसंग वेळ तर्केना सुचेना दी
सूचना । मैत्रिकी राखतां येना बुद्धि० ॥ ७ ॥ संसारीं श्लाध्यता नाहं
सर्वही लोक हांसती । वीसरू पडतो पोटीं बुद्धि० ॥ ८ ॥ चित्त दुश्चीं
होतें हें ताळतंत्र कळेचिना । आळसू लागला पाठीं बुद्धि० ॥ ९ ।
कळेना स्फुर्ति होईना आपदा लागली बहू । प्रत्यहीं पोट सोडी न
बुद्धि० ॥ १० ॥ संसार नेटका नाहीं उद्वेग वाटतो जिवीं । परमा
आकळेना कीं बुद्धि० ॥ ११ ॥ देईना पूरविना कोणी उगोचि ज
हांसती । लौकिक राखितां येना बुद्धि० ॥ १२ ॥ पीसुणें वाटती स
कोणीही मजला नसे । समर्था तूं दयासिंधु बुद्धि० ॥ १३ ॥ उदा
वाटतें जीवीं आतां जावें कुणीकडे । तूं भक्तवत्सला रामा बुद्धि० ॥ १४ ।
कायावाचा मनोभावें तुझा मी म्हणवीतसें । हे लाज तुजला माझी बुद्धि
॥ १५ ॥ सोडविल्या देव कोटी भूभार फेडिला बळें । भक्तांस

आश्चर्य मोठा बुद्धि० ॥ १६ ॥ उदंड भक्त तुम्हांला आम्हाला कोण पुसतें । धीर हें राखणें आधीं बुद्धि० ॥१७॥ उदंड ऐकिली कीर्ति पतीत पावना प्रभु । मी एक रंक दुर्बुद्धि बुद्धि० ॥ १८ ॥ आशा हे लागली मोठी दयाळुबा दया करीं । आणिक नलगे कांहीं बुद्धि० ॥१९॥ रामदास म्हणे माझा संसार तुज लागला । संशयो वाटतो पोटीं बुद्धि० ॥ २० ॥

पावला प्रसाद आतां उठा निजावें । आपल्याला श्रम होतो भावें स्वभावें ॥ तुम्हांसी जागविलें आपुलिया चाडा । शुभाशुभ कर्म दोष हरावया पीडा ॥

श्रीसद्गुरु सारिखा असतां पाठिराखा । इतरांचा लेखा कोण करी ॥ राजयाची कांता काय भीक मागे । मनाचिया जोगें सिद्धि पावे ॥ कल्प तरु तळवटीं जो कोणी बैसला । काय उणे त्याला सांगिजो जी ॥ ज्ञानदेव ह्मणे तरलों तरलों । आतां उद्धरिलों गुरुकृपें ॥

## पाळणा.

निजसुख पाळणा, पाळणा, हालवितें मी कृष्णा । क्षण भरि करि शयना, करि शयना, लागो दे तुज नयना ॥ ध्रु० ॥ चंदन काष्ठाचा, काष्ठाचा, रंगित भवरंगाचा । जडीत रत्नांचा, रत्नांचा, वर चेंडू मोत्यांचा ॥१॥ कळस सोन्याचा, सोन्याचा, चौकोनी रूप्याचा । सांखळ दंडाचा, दंडाचा, मंजुळ शद्वसुखाचा ॥ २ ॥ दोरी निजहातीं, निजहातीं, तुजला गाती गीतीं । सखया हालविती, हालविती, घे बाळा विश्रांती ॥ ३ ॥ ऐशा व्रजबाळा, व्रजबाळा, हालविती गोपाळा । त्रिंबक प्रभुलीला, प्रभुलीला वर्णिती वेळोवेळां ॥ ४ ॥

( २ )

जो जो जो जो रे श्रीरामा । निजसुखगुणविश्रामा ॥ ध्रु० ॥ ध्याती मुनियोगी तुजलागीं । कौसल्योत्संगीं ॥ १ ॥ वेदशास्त्रांची मति जाण । स्वरूपिं झाली लीन ॥ २ ॥ चारीमुक्तींचा विचार । चरणीं पाहती थोर ॥ ३ ॥ भोळा शंकर निशिदिनीं । तुजला जपतो मनीं ॥ ४ ॥ दास गातसे पाळणा । राम लक्ष्मणा ॥ ५ ॥

आसन हाकी कुळ्ळरसीदवनू । नासीकाग्र दृष्टी निल्लसीदवनू । बसूव वायुवा तुंबीसीदवनू । इंथा सूसूमुत्तिन माळि मल्गारिसिदवनू ॥ जो जो ० ॥ १ ॥ आरूचक्रदमेले अरडीसीदवनू । भेरे झांगुटी ताळा मोग्याडसीदवनू । बीरूव त्रीदळ साधन तोरिदनू । इंथा मूरूकोटीप्रभा बेळक तोरिदनू ॥ २ ॥ सहस्त्र दळदमनिया पोगीसीदवनू । जीवब्रह्मानंदा सुख उणिसिदवनू । केवळ सूषुम्नामार्ग तिळिसिदनु । नम्म देव चिदानंदा तानें अनसिदनू ॥ ३ ॥

( ४ )

देहविट्टू देहविल्लधांग इरबेकू । देहदगुणगळु तिळिदीरबेकू । मनसीन इंद्रियगळू दूरीरबेकू । हिंगे दिनदिनक अनुभव तिळिदिरबेकू ॥ जो जो० ॥ १ ॥ मातूविट्टू मात इलधांगिरबेकू । मातीन मजकूर तिळिदीरबेकू । पातकर गेळेतना दूरीरबेकू । इंथा नीतिमार्गके नेट्टागिरबेकू ॥ २ ॥ कण्णूविट्टू कण्णू इलधांगिरबेकू । कर्णीन कळेगळू तिळिदीरबेकू । हुणिवी चंद्रमन हागे उदगीरबेकू । नम्म देव चिदानंदन हागे इरबेकू ॥ ३ ॥

जो जो श्रीभाऊमहाराजा । ब्रम्हस्वरूप नी कैवल्य तेजा ॥ पल्ल ॥ देशपांड्यार मनियल्ली पुट्टी । उमदी ग्रामके आनंद कोट्टी ॥ साधुमहाराजरद आदितु भेट्टी । निंबरगी उरीगे बयिदा कयिमुट्टी । जो जो० ॥१॥ नामदप्रमादा आल्लीगे माडी । हिंचगिरीगे बंदाल्कूडी ॥ अगाणित शिष्यरू नामवु बेडी । एल्लेंत पेळली परमार्थदप्रौढी । जो जो० ॥ २ ॥ जयपरम हंसा नी माडुवे शयना । भक्तिलिंद तूगूत भक्तरूजना ॥ करवु मुगिदु देवा बेडूत यमुना । रूपगोचरागबेकू यन्ना ॥ ३ ॥ जो जो० ॥

जो जो जो जो रे सकुमारा । दत्तात्रेय अवतारा ॥ निद्रा करिं आतां, उदारा । अद्भुत वर दातारा ॥ ध्रु० ॥ कमलासन विष्णु, त्रिपुरारि । अत्रि मुनीच्या घरीं ॥ सत्व हरूं आले, नवलपरी । भ्रम दौडिला दूरी ॥ १ ॥ प्रसन्न त्रयमूर्ति, होऊनी । पुत्रत्वा पाहूनी ॥ हर्ष जालासे, त्रिभुवनीं ।

दाटे ऋषींचे सदनीं ॥ २ ॥ पालख बांधिला, सायासीं । निर्गुण ऋषीचे वंशीं ॥ पुत्र जन्मला, अविनाशी । अनसूयेचे कुशीं ॥ ३ ॥ षड्रस नामासीं, आधार । दत्तात्रय अवतार ॥ कृष्ण दासासी, सुख थोर । आनंद होतो फार ॥ ४ ॥



पाळणा हलवावे, सदोदित पाळणा हलवावे ॥ धु०॥ भक्तिचा पाळणा करुनि आतां, साधकें हलवावे, सदोदित साधकें हलवावे ॥ मुक्ति दायक नाम सद्गुरुचें पाळणा हलवावे ॥ १ ॥ ज्ञानमुर्ति निजवुनि आतां हळुच हलवावे, सदोदित हळुच हलवावे । नामदृष्टि त्यांनीं देऊन निजले ते धरुन हलवावे ॥ २ ॥ त्रिलोकांमधीं प्रसिद्ध झाले भाऊराज ज्ञानी । आत्मरुप त्यांनी दाऊनि निजले पाहुनि हलवावे, सदोदित पाहुनि हलवावे ॥ ३ ॥

ज्यांहीं देउनि बीजमंत्र मजला संसारिं या तारिलें । मोक्षाची मज जाण वाट बरवी दावूनिया सोडिलें । जन्माची सगळी मुळी खणुनियां दूरावली ती पहा । ऐसा सद्गुरुराज मी नमितसें आतां असो लोभ हा ॥ १ ॥

माझ्या सद्गुरुचा अगाध महिमा कैसा शकें दीन मी । वर्णाया श्रुति शेष जेथ थकले तेथें मतिमंद मी । पाहोनी निरपेक्ष प्रेम इतुकें लोटे सदा नीर हीं । ओंवाळूनि तयावरीहि अमुच्या प्राणासि टाकूं आम्ही ॥ १ ॥

अमोलिकरत्न जोडलेंरे तूज । कांरे ब्रम्हबीज नोळखिसी ॥ न बुडे न कळे न भिये चोरा । ते वस्तु चतुरा सेविजेतु ॥ ज्ञानदेवो म्हणे अविनाश जोडलें । आणूनि ठेविलें गुरुमुखीं ॥

ही सहज समाधी लाधली निर्गुणीं, खुंटली ही वाणी न चले तेथें । खुंटला हा शब्द राहिला व्यापार, झाला साक्षात्कार सदोदित ॥

मळालें इंद्रिय राहिलेंऽसे मन, झालें महाशून्य एकाएकीं ।
गळाली ही वृत्ति झालीसे निवृत्ति, पूर्ण ब्रह्मस्थिति मुक्ताबाई ॥



# श्री सद्गुरु भाऊसाहेब महाराज यांचें निर्याण.

गुरुवार माघ शु० ३ शके १८३५. (तारीख २९ माहे जानेवारी सन १९१४ इ.)

संपलेसें वाटे अवतारकार्य । ह्मणोनियां काय त्वरा केली ॥
जातों ह्मणोनियां सांगितलें आधीं । सर्वेही उपाधी त्यागियेली ॥
शिष्य विनविती आपणांसी जाणें । मागें भक्ति कोणें चालवावी ॥
तुम्हांसी हो त्याची काय असे चिंता । भक्ति चालविता देव असे ॥
चिंता केली तरी होईल तें होतें । कदा चुकेना तें देवकाज ॥
ऐसें वदोनियां वाणी बंद केली । आंत नामावळी चाललीसे ॥
नाम चालविलें एकादश दिन । भोजनजीवन त्यागियेलें ॥
माघ शुद्ध तृतिया दिन गुरुवार । रात्र एक प्रहर झाली असे ॥
शिष्य मिळोनियां करिती भजन । सप्रेम जीवन डोळां लोटे ॥
भजनाचें अंतीं विठ्ठल गर्जना । अतिप्रेमें जाणा चाललीसे ॥
कापुराची ज्योती निमतां देखोनि । टाळी वाजवूनी देह सोडी ॥
सोडी देह आमुचा धन्य गुरुनाथ । ज्योतीमध्यें ज्योत गुप्त झाली ॥

जय निर्गुण निराकार प्रभो—मोदलु रेवणसिद्ध अवतारनागि—रेणागिरिपर्वतदल्लि क्रीडेयन्नाडि—आमेले काडसिद्धेश्वर अवतारनागि—अतिवेगदिंद सिद्धगिरिगे बंदु—आ सिद्धगिरिय कोळ्ळदल्लि ऐक्यनागि गुरुलिंगजंगम अवतार तोडलु—आमेले नारायणन रूप ताळि—निंबरगीयल्लि

अवतार तोडलु–आमल रघुनाथप्रिय रेंबुवरु बंदु–साधुयेंदु बिरुद्र-सारलागि–संभवामि युगे युगे सगुणरूपागि–पुण्य–परमपवित्र हिंचगिरी-स्थानदल्लि कुरहु इडलागि–काडसिद्धेश्वर सगुणरूपके बंदु–चिमडस्थान-दल्लि सगुणरूपके बंदु–युगे युगे अवतार तोडलागि योगनिष्ठावंत नेनिसलगि–असंख्य एष्टो भवरोग होगलागि–विश्वब्रह्मरूप माडलागि एष्टो व्याधि बाधे दूर माडलागि–एनादरू सगुणरूपदल्लि निर्गुण आग-लागि–देव रूपके कुरहु आगुवा–नरकरणीमाडलागि–नारायणरूप आगुवदु ॥ १ ॥

देवाच्या घरची आहे उलटी खूण । पाण्याला मोठी लागली तहान ॥ १ ॥ आंत घागर बाहेर पाणी । पाण्याला पाणी आणी बांधोनी ॥ २ ॥ हंडा खाऊन भात टाकिला । बकऱ्याच्या पुढें देव कापिला ॥ ३ ॥ आज एक आम्हीं नवल देखिलें । वळचणीचें पाणी आढ्यासी गेलें ॥ ४ ॥ शेत पेरून हुरड्यासि आला । शेताचा राखणदार शेतानें गिळिला ॥ ५ ॥ एकाजनार्दनीं मार्ग आहे उलटा । जो जाणेल तो तरेल सद्गुरूका बेटा ॥ ६ ॥

माता पिता दोन्हीं जीवेंचि मारावें । चरण वंदावे बायकोचे ॥ १ ॥ गाईसी मारावें रामासी त्यागावें । भजन करावे गाढवाचें ॥ २ ॥ बहिणीचें लग्न भावासी लावावें । तेणें सुख पावे ब्रह्मपद ॥ ३ ॥ तुका म्हणे पुण्य असेल माझे गांठी । तरीच हें दृष्टीं देखेन मी ॥ ४ ॥



## श्री सद्गुरु भाऊसाहेब महाराजांचे

शिष्य

## श्री सद्गुरु सिद्धरामेश्वर महाराज यांचे जवळून ज्या साधकांनीं गुरूपदेश घेतला आहे त्यांना

## सूचना.

१ सकाळीं, दुपारीं, आणि सायंकाळीं, असें त्रिकाळ ध्यान करावें. ध्यान केल्याशिवाय जेवूं नये.

२ साक्षात्काराकडे प्रेमानें लक्ष लावावें.

३ नित्य मनांमध्यें नामाचें ( मंत्राचें ) पठण करावें.

४ उपदेशित मंत्र अनिर्वाच्य आहे ह्मणून कोणालाहि तो सांगूं नये, व त्याचा तोंड उघडून उच्चार करूं नये.

५ परस्त्री मातेसमान मानावी.

६ दररोज घरीं सांप्रदायिक भजन करावें.

७ गुरु क्षेत्र इंचगिरी येथें वर्षांतून चारवेळ सप्ताह होत असतो. त्या सप्ताहास हजर रहावें. पान २५ पहा.

८ कोणालाहि कांहीं खुलासा ( विचारपूस ) करावयाची असल्यास श्री सिद्धरामेश्वर महाराजांना प्रत्यक्ष अथवा खालील पत्त्यावर कार्ड किंवा पत्र पाठवून विचारावें.

पत्ता:—**किसनसिंग पंचमसिंग हेडमास्तर**

घर नंबर १०, पूर्व मंगळवार पेंठ, सोलापूर

अथवा.

**हिरालाल कालिदास वखारिया**

भाईशेट बिल्डिंग, कुंभार तुकडा,

गिरगांव पोष्ट, मुंबई.

"The greatest men in the world have p
away unknown. The Budhas and the Christs,
we know, are but second rate heroes, in co
rison with the greatest men of whom the 
knows nothing. Silently they live and silently
pass away; and in time their thoughts find ex
sion in Budhas and Christs, and it is these
that become known to us.

——Vivekanand



**चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये ।**
**वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित् कर्मकोटिभिः ॥**

कर्मानें चित्तशुद्धि होते ह्मणून मरे तों पर्यंत कर्म करूं नये. न
भोजनाकरितां शौचस्नानादि देहशुद्धि करावयाची असते, पण देहशु
चोवीस तास न करितां थोडक्यांत आटपून भोजनादि सुखाची क्रि
जशी करावयाची असते, तसें चित्तशुद्धीचें कर्म थोडक्यात आट
ज्ञानानें परमानंद मिळवावा.

